**सहकार खात्यातील लेखा व अर्थसंकल्पाच्या कामासाठी नेमलेल्या कर्मचाऱ्यांच्या १६ अस्थायी पदांना सन २०१७-१८ साठी दि.०१/०३/२०१७ ते ३०/०९/२०१७ पर्यत मुदतवाढ देण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस २०१७/प्र.क्र.३६ /५ स,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :-१८ फेब्रुवारी, २०१७

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.५/५/२०११

२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र. ८/विसु-१, दि.२१/९/२०१६

३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस २०१६/ प्र.क्र. ६८/ ५ स, दि.१४/१०/२०१६

४) सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. आस्थापना/ कक्ष-१/ लेखा व अर्थ/ अस्थायीपदे / मुदतवाढ/१००/२०१७, दि.३१/१/२०१७

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र. ८/आपुक दि.१०/२/२०१७

**शासन निर्णय :-**

सहकार खात्यातील लेखा व अर्थसंकल्पाच्या कामासाठी आवश्यक असलेली १६ अस्थायी पदे दिनांक २८/२/२०१७ पर्यन्त पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. प्रशासकीय कारणास्तव सदरची पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असून त्यांना सन २०१७-१८ साठी मुदतवाढ मिळणे आवश्यक आहे. सबब, शासन निर्णय दि.५/५/२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून खाली नमूद केलेली १६ अस्थायी पदे दि.०१/०३/२०१७ ते ३०/९/२०१७ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

| पदनाम | पदांची संख्या |
|---|---|
| मुख्य लिपिक | १६ |

२. वरील अस्थायी पदांची जिल्हावार विगतवारी सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र पुणे स्वतंत्रपणे प्रसृत करतील.

३. यावर होणारा खर्च "२४२५-सहकार, ००१-संचालन व प्रशासन (०१) (०५) विभागीय व जिल्हा प्रशासन दत्तमत २४२५००६७)" या लेखाशिर्षाखाली दाख वावा व त्याखालील सन २०१७-२०१८ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.१०/२/२०१७ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०१७०२१८१४१३१८१२०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Gaikwad

Digitally signed by Nitin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, serialNumber=2276ac762af372d872c2f01d5bb5086166f4a6e20a1bdf9762d556a93f5d118e, cn=Nitin Gaikwad
Date: 2017.02.18 14:15:33 +05'30'

**( नितीन गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन),
३. सर्व संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, द्वारा-सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१,२, (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. अधिदान व लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. उपकोषागार अधिकारी, वाशी, नवी मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग/ जळगांव/ पुणे/ सातारा/ परभणी/ बीड/बुलढाणा अकोला/ अमरावती/वर्धा/जालना/नागपूर
१०. वित्त विभाग, (व्यय-२/अर्थसंकल्प-१९/ वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई - ३२
११. कक्ष अधिकारी, कार्यासन १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,
१२. निवड नस्ती.